अमरावती विभागातील भूसंपादन आस्थापनेवरील अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांक: पमुवा -२०२३/प्र.क्र.१०१/अ-१
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १७ एप्रिल, २०२५

वाचा : १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक पमुवा-२०२३/प्र.क्र.१०१/अ-१, दि. २४ ऑक्टोबर, २०२४
२)वित्त विभाग, शा.नि.क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५
३)विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र.सहआ/पुनर्व/आस्था/म.स./भूसं. मुदतवाढ/कावि-६५/२०२५, दि.१२.०३.२०२५

**प्रस्तावना :-**

वित्त विभाग, शासन निर्णय दि.०३.०३.२०२५ अन्वये, दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ या कालावधी करीता अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत प्रशासकीय विभागांना अधिकार प्रदान करणेबाबत मान्यता देण्यात आली आहे.

विभागीय आयुक्त, अमरावती यांनी त्यांचे दि.१२.०३.२०२५ रोजीच्या पत्रानुसार त्यांच्या अधिनस्त असलेल्या भूसंपादन कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत विनंती केली आहे. यापूर्वी या विभागाच्या शासन निर्णय दि.२४.१०.२०२४ अन्वये, दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ प्रदान करण्यात आलेली आहे. भूसंपादन कार्यालयामध्ये कार्यरत पदांचा आकृतीबंध निश्चित झालेला नसल्यामुळे वित्त विभागाने प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून विभागीय आयुक्त, अमरावती यांचे अधिनस्त विभागातील भूसंपादन कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

अमरावती विभागातील भूसंपादन आस्थापनेवरील ५६ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत मंजूरी देण्यात आली होती. सोबत जोडलेल्या जोडपत्र (अ) मध्ये दर्शविलेली सदर एकूण ५६ अस्थायी पदे दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत चालु ठेवण्यास पुढील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.-

१) अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदावरील अधिकारी / कर्मचारी यांना विभागामार्फत रिक्त पदावर सामावून घेण्यात आले आहे अथवा वित्त विभागाकडील अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे वर्ग करण्यात आले आहे.

२) अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदांवरील कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते यांचे प्रदान कोणत्याही परिस्थितीत विभागातील कायम/स्थायी, अस्थायी पदांसाठीच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून करण्यात येत नाही.

३) प्रस्तावाधीन प्रकरणामध्ये मुदतवाढ प्रस्तावित करण्यात आलेल्या पदांपैकी काही पदे ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त असल्याचे निदर्शनास आले आहे. विभागीय आयुक्त आणि जिल्हाधिकारी, यांनी सदरच्या पदाची नमूद केलेली अत्यावश्यकता विचारात घेता, सदर रिक्त पदे तात्काळ भरण्याच्या अटीवर मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदीस विसंगत कार्यवाही करण्यात आल्यास व त्यामुळे काही अडचणी उद्भवल्यास त्यास संबंधित कार्यालय जबाबदार राहील.

४) सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

५) सदर पदांचा अस्थायी पदांच्या आढाव्यामध्ये समावेश आहे.

२. ही सर्व पदे संबंधित विभागाच्या स्थायी संवर्गातील तात्पुरती भर म्हणून समजण्यात यावी.

३. सदरहू पदांवरील पदधारक शासनाच्या वेळोवेळी निघालेल्या आदेशांप्रमाणे महागाई भत्ता व इतर पूरक भत्ते मिळण्यास पात्र राहतील.

४. याबाबत होणारा खर्च योजनेतर पदांवरील खर्च मागणी क्र. सी-१/२०२९/जमीन महसूल ००१-संचालन व प्रशासन (००१) (१) भूसंपादन आस्थापना (१) (०४), आयुक्त, अमरावती वेतने योजनेतर (२०२९ ०२३३) तसेच (२०२९०१०८) या लेखाशीर्षाखाली आणि योजनांतर्गत पदांवरील खर्च मागणी क्रमांक सी-१,२०२९ जमीन महसूल ००१- संचालन व प्रशासन-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना (०२) भूमी संपादन आस्थापना (योजनांतर्गत) (०२) (०६) आयुक्त, अमरावती वेतने (२०२९ २५१०१) (दत्तमत) लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून तो खर्च वित्तीय वर्ष २०२५-२०२६ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच याबाबतचा प्रत्यक्ष खर्च वर्षअखेर संबंधित संपादन विभागाकडे (महसूल व वन विभागाखेरीज) वर्ग करण्यात यावा.

५. **<u>सदर पदांच्या आवश्यकतेबाबत दि.३१.०८.२०२५ पूर्वी आढावा पूर्ण करण्याच्या अधीन राहून सदर मान्यता देण्यात येत आहे.</u>**

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

विभागीय आयुक्त, अमरावती यांनी त्यांच्या आस्थापनेवरील व नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घ्यावा. पदांचा आढावा घेताना शासनाच्या कार्यपद्धतीतील तंत्रज्ञानाचा वाढता वापर, काळानुरुप शासनाच्या मनुष्यबळात बदल व मनुष्यबळाच्या परिणामकारक वापराची आवश्यकता या बाबींचा विचार करुन अनावश्यक पदे कमी करण्याचाही विचार करावा. दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ या कालावधीमध्ये आढाव्यास (नव्याने निर्माण केलेल्या पदांसह) उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेऊन सुधारित आकृतिबंध निश्चित करणे आवश्यक आहे. सबब,

त्याबाबतचे प्रस्ताव विहित कालावधीत शासनास सादर करण्याची कार्यवाही करावी. सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याकरिता कालावधी वाढवून दिला जाणार नाही. मुदतवाढीअभावी सदर अस्थायी पदांना वेतनाचा प्रश्न उद्भवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी आपल्या कार्यालयाची राहील याची नोंद घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४१७१७१३५४३०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANIK VITTHAL DHAMALE

Digitally signed by MANIK VITTHAL DHAMALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=56ec16312a634dd1d6237d2d17aa0f5fb47d9a2353765a9688e57f460b5271d9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D2C09929ACAFC324A4E5E44875953A3AEF77C004844BEE29381808FC25AAC97F, cn=MANIK VITTHAL DHAMALE
Date: 2025.04.17 17:15:10 +05'30'

**(माणिक ढमाले)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सोबत:- जोडपत्र-अ**

प्रति,

१. मावने) अपर मुख्य सचिव.,भूसंपादनमहसूल वन विभाग (, मंत्रालय, मुंबई३२-
२. विभागीय आयुक्त, अमरावती, अमरावतीप्रती २) )
३. महालेखापाल प्रती २) नागपूर / मुंबई (अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) २/१ -)
४. जिल्हाधिकारी, नागपूर /गोंदिया/भंडारा /चंद्रपूर/वर्धा/गडचिरोली.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर .गडचिरोली / गोंदिया / भंडारा / चंद्रपूर/ वर्धा /
६. जलसंपदा विभाग, कार्यासन १९-टि/१२-टि/४-टि), मोप्र२-, अर्थव बी शाखा १-), मंत्रालय, मुंबई.३२-
७. उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.३२-
८. उपसचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.३२-
९. उपसचिव (९-अर्थ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.३२-
१०.कार्यासन अधिकारी (अ-२/अ-३/अ-४/ई-१/ई-६/ई-७/ई-८/भ-१,र-१२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११.निवडनस्ती ( अ-१ ), मंत्रालय, मुंबई-३२.

# जोडपत्र - अ

महसूल व वन विभाग, क्रमांक पमुवा-२०२३/प्र.क्र.१०१/अ-१, दि.१७ एप्रिल, २०२५

अमरावती विभागातील भूसंपादन आस्थापनेवरील मुदतवाढ द्यावयाच्या ५६ अस्थायी पदांबाबतचे विवरणपत्र:-

| अ.क्र. | उपजिल्हाधिकारी( भूसंपादन) यांचे पदनाम व मुख्यालय | मुदतवाढीसाठी अमरावती विभागातील अस्थायी पदांचा तपशील | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | उपजिल्हाधिकारी ( भूसंपादन) | प्र.श्रे. लिपिक | लिपिक टंकलेखक | मंडल अधिकारी | शिपाई | एकूण |
| ०१ | उपजिल्हाधिकारी( भूसंपादन), लघुसिंचन कामे, अमरावती. | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०२ | ०६ |
| ०२ | उपजिल्हाधिकारी ( भूसंपादन) अपर वर्धा प्रकल्प क्र. ४ अमरावती. | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०२ | ०६ |
| ०३ | उपजिल्हाधिकारी ( भूसंपादन) काटेपुर्णा मोर्णा प्रकल्प, अकोला. | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०२ | ०६ |
| ०४ | उपजिल्हाधिकारी ( भूसंपादन), लघुसिंचन कामे, बुलडाणा. | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०२ | ०६ |
| ०५ | उपजिल्हाधिकारी( भूसंपादन), मध्यम प्रकल्प, बुलडाणा. | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०२ | ०६ |
| ०६ | उपजिल्हाधिकारी( भूसंपादन), ई. व. द. बुलडाणा. | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०२ | ०६ |
| ०७ | उपजिल्हाधिकारी( भूसंपादन), लघु सिंचन कामे क्र. २ यवतमाळ. | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०० | ०४ |
| ०८ | उपजिल्हाधिकारी( भूसंपादन), रस्ते प्रकल्प यवतमाळ. | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०२ | ०६ |
| ०९ | उपजिल्हाधिकारी( भूसंपादन), बेंबळा प्रकल्प, यवतमाळ. | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०२ | ०६ |
| १० | उपजिल्हाधिकारी( भूसंपादन), क्र. १ वाशिम. | ०१ | ०० | ०० | ०१ | ०० | ०२ |
| ११ | उपजिल्हाधिकारी( भूसंपादन), क्र. २ वाशिम. | ०१ | ०० | ०० | ०० | ०० | ०१ |
| १२ | नगर रचनाकार, आयुक्त कार्यालय,अमरावती. (निवाडा शाखा) लेखाशीर्ष २०२९०१०८. | ०१ | ०० | ०० | ०० | ०० | ०१ |
| | एकूण | १२ | ०९ | ०९ | १० | १६ | ५६ |

MANIK VITTHAL DHAMALE

Digitally signed by MANIK VITTHAL DHAMALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=56ec16312a634dd1d6237d2d17aa0f5fb47d9a2353765a9688e57f460b5271d9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D2C09929ACAFC324A4E5E44875953A3AEF77C004844BEE29381808FC25AAC97F, cn=MANIK VITTHAL DHAMALE
Date: 2025.04.17 17:15:31 +05'30'

( माणिक ढमाले )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.